(१४ पैकी शासन निर्णय क्र.८)
फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत.
साक्षीदारांकरिता सोईसुविधा पुरविणे बाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १२ मे, २०१५

प्रस्तावना :-

न्यायालयात साक्षीकरिता हजर राहणा-या साक्षीदारांना आहारभत्ता व प्रवास भत्ता संबधित न्यायालयामार्फत देण्यात येतो. तथापि, सध्या देण्यात येत असलेला सदरचा भत्ता कमी असल्याकारणाने ब-याचवेळा साक्षीदार खटल्याच्या सुनावणीस उपस्थित राहण्यास टाळाटाळ करतात. तसेच, साक्षीदार न्यायालयामध्ये साक्षीसाठी उपस्थित झाल्यानंतर शासकिय अभियोक्त्यासोबत पुर्व चर्चा होणे आवश्यक आहे जेणेकरुन, खटल्याच्या सुनावणीमध्ये प्रभावीपणे बाजू मांडून दोषारोपसिध्दीचे प्रमाण वाढविणे शक्य होईल. तथापि अशी पुर्व चर्चा करण्याकरिता कोणत्याही सोईसुविधा न्यायालयाच्या आवारात उपलब्ध नाहीत. तसेच पंच फितूर होण्याचेही प्रमाण अधिक असल्याचे निदर्शनास आले आहे. या सर्व बाबींचा विपरित परिणाम खटल्याच्या सुनावणीवर होऊन दोषारोपसिध्दीचे प्रमाण घटत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. सबब साक्षीदारास देण्यात आहार भत्ता व प्रवास भत्यामध्ये वाढ करण्याबरोबरच शासकीय अभियोक्त्यासोबत पुर्व चर्चा करण्यासाठी सोईसुविधा पुरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

विविध फौजदारी गुन्हयात दाखल खटल्यातील सुनावणीदरम्यान साक्षीदाराची महत्वाची भुमिका विचारात घेऊन साक्षीदारास देण्यात येणारा आहार भत्ता व प्रवास भत्यामध्ये वाढ करण्याबरोबरच शासकिय अभियोक्त्यासोबत पुर्व चर्चा करण्यासाठी सोईसुविधा पुरविण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. न्यायालयात साक्षीकरिता हजर राहणा-या साक्षीदारांना Maharashtra Payment by Government of Expenses of Complainants and Witness (Attending Criminal Courts) Rules,१९८० अन्वये वर्ग १ साक्षीदार व वर्ग २ साक्षीदार यांना सध्याच्या प्रतिदिन रु.१००/- ऐवजी प्रतिदिन रु.२००/- एवढा आहारभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

३. न्यायालयात साक्षीकरिता हजर राहणा-या साक्षीदारांना Maharashtra Payment by Government of Expenses of Complainants and Witness (Attending Criminal Courts) Rules,१९८० अन्वये वर्ग ३ साक्षीदार व वर्ग ४ साक्षीदार यांना सध्याच्या प्रतिदिन रु.६०/- ऐवजी प्रतिदिन रु.१२०/- एवढा आहारभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

४. खटल्याच्या सुनावणीकरिता येणा-या साक्षीदार यांचेसोबत शासकिय अभियोक्त्यास पुर्वचर्चा करण्यासाठी प्रत्येक न्यायालयाच्या आवारामध्ये २५० चौ.फु. पर्यंतची खोली बैठक व्यवस्था, पाणी व प्रसाधनगृह इत्यादी मुलभुत सोयीसुविधांसह बांधण्यात यावी.

५. प्रबंधकांनी न्यायालयाच्या आवारातील सोईस्कर जागा सुनिश्चित करुन रक्कम रुपये ३.७५ लक्ष इतक्या खर्चाच्या मर्यादेत सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रक तयार करुन घ्यावे.

६. सदर अंदाजपत्रकास विधि व न्याय विभागाकडून प्रशासकिय मंजुरी प्राप्त करुन देण्याबरोबरच आर्थिक तरतूद करुन घेण्याची कार्यवाही संबधित न्यायालयाच्या प्रबंधकांनी करावी.

७. Maharashtra Payment by Government of Expenses of Complainants and Witness (Attending Criminal Courts) Rules,१९८० मध्ये आवश्यक त्या सुधारणा विधि व न्याय विभागाने तातडीने कराव्यात.

८. सदर शासन निर्णय विधि व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र २१०६ दि.२९/०४/२०१५ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१२१७१५२३३३२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 12:27:25 +05'30'

**(द.सं.पाटील)**
**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
५. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
८. प्रधान सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
९. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई

१०. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
११. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
१२. सर्व पोलीस आयुक्त
१३. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१४. सर्व अपर पोलीस महासंचालक
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१७. सर्व पोलीस अधीक्षक
१८. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१९. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
२०. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
२१. उप सचिव (पोल-१०)
२२. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. निवडनस्ती